**हाफकीन महामंडळाकडे प्रलंबित असलेल्या तपशिलवार देयके सादर करण्यासाठी मुदतवाढ मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
शासन निर्णय क्रमांक खरेदी-२०१६/प्रक्र-२४०/आरोग्य-८
गो.ते.रुग्णालय संकूल इमारत,१०वा मजला,बी-विंग,
मंत्रालय, मुंबई.
दिनांक ३१ मार्च, २०२०.

वाचा : १. संचालक आरोग्य सेवा मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-०३/टे ३/संक्षिप्त देयके १८-१९ /६३३४-३६, दिनांक १६ मे २०१९.
२. शासन निर्णय क्र.खरेदी-२०१६/२४०/आरोग्य-८, दि.७ मार्च, २०१८
३. शासन पुरकपत्र क्र.खरेदी-२०१६/२४०/भाग-१/आरोग्य-८, दि.४ जानेवारी, २०१९.

**शासन निर्णय-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ अन्वये हाफकीन महामंडळ, मुंबई यांच्या अंतर्गत खरेदी कक्ष स्थापन करुन सन २०१७-१८ पासून औषधी, उपकरणे, यंत्रसामुग्री, तदअनुषंगिक वस्तुंसाठी अर्थसंकल्पीत निधी संक्षिप्त देयकाद्वारे आहरीत करुन हाफकीन महामंडळ, मुंबई अंतर्गत खरेदी कक्षाकडे वर्ग करण्याबाबत निर्णय घेण्यांत आला होता. संदर्भ क्र.३ अन्वये गृह विभागास दिलेल्या परवानगीच्या धर्तीवर सार्वजनिक आरोग्य विभागास संक्षिप्त देयकांची तपशिलवार देयके (एसी बिल) प्रलंबित असताना दुस-या संक्षिप्त देयकावर रक्कम काढण्याची परवानगी पर्यायी व्यवस्था होईपर्यंत (या प्रयोजनार्थ नविन लेखाशिर्ष उपलब्ध होईपर्यंत) विशेष बाब म्हणून मान्यता प्रदान करण्यांत आली होती.

सन २०१९-२० मध्ये विविध स्त्रोत्राद्वारे औषधे व सामुग्री (सामुग्री व पुरवठा) तसेच यंत्रसामुग्री व साधनसामुग्री या बाबीसाठी प्राप्त झालेला निधी पुर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित असताना संक्षिप्त देयकावर आहरीत करुन तो हाफकिन महामंडळ, मुंबई अंतर्गत खरेदी कक्षाकडे वर्ग करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यांत येत आहे.

सन २०१७-१८, सन २०१८-१९ व सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील संक्षिप्त देयकाद्वांरे आहारित केलेल्या निधीच्या संक्षिप्त देयकांची तपशिलवार देयके काषागारात सादर करण्यासाठी मार्च २०२१ पर्यंत खालील अटींच्या अधिन राहून वित्त विभागाने खास बाब म्हणून मान्यता दिलेली आहे.

आरोग्य सेवा आयुक्तालयाने व हाफकीन महामंडळाने मागील तीन वर्षात संक्षिप्त देयकावर आहरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने औषधे, वैद्यकीय उपकरणे इत्यादी बाबींच्या खरेदी संदर्भातील देयकांची तपशिलवार देयके कोषागारात पुढील सहा महिन्यांत सादर करणे याबाबत कालबध्द कार्यक्रम राबवावा.

संक्षिप्त देयकाद्वारे प्राप्त झालेली रक्कम व तपशिलवार देयकाची रक्कम याचा ताळमेळ घालून आयुक्तालयाने व महामंडळाने याबाबत लेखा आक्षेप येऊ नये, रक्कमेचा अपहार होऊ नये याबाबत दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०२००३३०१५१७३८१९१७ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jamsher Samsher Tadavi

Digitally signed by Jamsher Samsher Tadavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc70f5be589b29aaa447f5cdd15c9826781de5daa02a4ecf339fb1d0559ab9d6, serialNumber=a92e218ede7b7c9acaa3bea18f6d46feab420783e12f260504f402b54de8c476, cn=Jamsher Samsher Tadavi
Date: 2020.04.19 11:27:11 +05'30'

**(ज.स.तडवी)**
**अवरसचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव
२) अपर मुख्य सचिव, वित्त / वि.सु./नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, (ले.को. वित्त / सा.आ.वि.), मंत्रालय, मुंबई
४) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
५) सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव
११) सहसचिव / उपसचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) मा.मंत्री (वित्त/सा.आ.वि./वै.शि.व औ.द्र./अ. व औ.प्र. विभाग) यांचे खाजगी सचिव

१३) मा.राज्यमंत्री (वित्त/सा.आ.वि./वै.शि.व औ.द्र./अ. व औ.प्र. विभाग) यांचे खाजगी सचिव

१४) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय

१५) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

१६) व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि., परेल मुंबई

१७) आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, परेल, मुंबई

१८) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र एड्स नियंत्रण संस्था, मुंबई

१९) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

२०) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

२१) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई

२२) संचालक, आयुष संचालनालय, मुंबई

२३) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)

२४) सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)

२५) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)

२६) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या अधिपत्याखालील सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय / दंत / आयुर्वेद महाविद्यालय व रुग्णालये

२७) कार्यासन अधिकारी (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

२८) निवडनस्ती (आरोग्य ८), सा.आ.वि.